**कुंभमेळयानिमित्त त्र्यंबकेश्वरकरीता तात्पुरत्या स्वरुपात भाडेतत्वावर सीसीटीव्ही यंत्रणा बसविण्याकरीता रु.७५,२९,६८०/- इतक्या वाढीव रक्कमेच्या कामास प्रशासकीय मंजूरी देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टीटीसी-०२१५/प्र. क्र. १०४/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला,
मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २७ मार्च २०१५

**वाचा -**

1) **शासन निर्णय क्रमांकः आयएसएस १००९/प्र. क्र. ३१३/विशा-४, दि.२७.७.२०११.**
2) **शासन निर्णय क्रमांकः आयएसएस १०१३ /प्र. क्र. ३२२ / (भाग-२) / विशा-४, दि.१८.११.२०१४, दि.२०.१.२०१५ आणि दि.१.१.२०१५.**
3) **पोलीस आयुक्त, नाशिक यांचे क्र. कक्ष-१०/सिंहस्थ शाखा/सीसीटीव्ही यंत्रणा/२९८/२०१५, दि. २५.३.२०१५ चे पत्र.**

**प्रस्तावना -**

नाशिक व त्र्यंबकेश्वर येथे सन २०१५-१६ मध्ये सिंहस्थ कुंभमेळा होणार आहे. या कुंभमेळया दरम्यान सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून सीसीटीव्ही यंत्रणा कार्यान्वित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय शक्तीप्रदान समितीच्या दि.१३.२.२०१४ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार सीसीटीव्ही प्रकल्पासाठी निधीची तरतुद गृह विभागाने करावयाची आहे. उच्च स्तरीय शक्तीप्रदान समितीच्या दि.११.८.२०१४ रोजीच्या बैठकीमध्ये कुंभमेळयानिमित्त तात्पुरत्या स्वरुपात भाडेतत्वावर सीसीटीव्ही यंत्रणा उभारण्याचा निर्णय झाला आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र.२ वरील दि.१८.११.२०१४ आणि दि.१.१.२०१५ च्या शासन निर्णयान्वये, त्र्यंबकेश्वर येथे कुंभमेळयानिमित्त तात्पुरत्या स्वरुपात भाडेतत्वावर सीसीटीव्ही यंत्रणा बसविण्याकरीता रु. ३.३५ कोटी इतक्या खर्चास प्रशासकीय तसेच निधी वितरणास मान्यता दिली होती. विषयांकीत कामासाठी निविदा प्रक्रिया राबविण्यासाठी पोलीस आयुक्त, नाशिक शहर यांच्या अध्यक्षतेखाली खरेदी व तांत्रिक समिती स्थापन करण्यास शासन निर्णय दि.२०.१.२०१५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. खरेदी व तांत्रिक समिती सदस्यांच्या मान्यतेने ई-निविदा प्रक्रीया राबविण्यात येवून दि.२५.३.२०१५ रोजी समिती सदस्यांच्या उपस्थितीत ई-निविदा प्रक्रीयेतंर्गत व्यापारी लिफाफा खुला करण्याची प्रक्रिया

राबविण्यात आली. यासंदर्भातील निविदा प्रक्रीयेमध्ये प्राप्त झालेल्या दर विचारात घेवून, याकामी वाढीव रक्कमेच्या कामास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

सिंहस्थ कुंभमेळयासाठी त्र्यंबकेश्वर येथे एकूण ५५ ठिकाणी १८० कॅमेरे बसविण्यासाठी आणि त्र्यंबकेश्वर पोलीस ठाणे येथे कायमस्वरुपी सीसीटीव्ही कंट्रोल रुम उभारण्यासाठी येणाऱ्या एकूण रु. ३.३५ कोटी रक्कमेच्या अंदाजपत्रकास शासनाच्या क्र. आयएसएस १०१३/प्र. क्र. ३२२/(भाग-२)/विशा-४ दि.१८.११.२०१४ व दि.१.१.२०१५ चे शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सदरहू कामासाठी प्राप्त झालेले निविदेचे दर आणि पोलीस आयुक्त, नाशिक यांचा संदर्भाधीन क्र. ३ वरील दि. २५.३.२०१५ चा प्रस्ताव विचारात घेता, त्र्यंबकेश्वर येथील सीसीटीव्ही प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी शासन याद्वारे रु. ७५,२९,६८०/- एवढया वाढीव रक्कमेच्या कामास प्रशासकीय मंजूरी देत आहे.

२. महाराष्ट्र वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग-तीन मधील अ. क्र. ४ समोरील नियम क्र. २७ (२) अनुसार प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्राप्त झालेल्या अधिकारास अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२७१५१८३२२१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM
DATTATRAY
HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: CN = KADAM DATTATRAY HANMANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME DEPT,CID - 918120
Date: 2015.03.27 15:53:11 +05'30'

**(द. ह. कदम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. प्रधानसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६. प्रधानसचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, मुंबई
८. सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. पोलीस आयुक्त, नाशिक,
१०.विशेष पोलीस महानिरीक्षक,नाशिक परिक्षेत्र, नाशिक,
११.आयुक्त, नाशिक महानगरपालिका
१२.जिल्हाधिकारी, नाशिक
१३.पोलीस अधीक्षक, नाशिक (ग्रामीण)
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१७.वित्त विभाग,कार्यासन व्यय-७
१८. निवडनस्ती, पोल-३